इन्फेटेबल रबर बोट (IRB) या साहित्याचा पुरवठा केल्याने मे. GANESHMFG PVT. यांना पहिल्या हप्त्याचे देयक अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२२/प्र.क्र. १९५/आव्यप्र-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. ३० मार्च, २०२४.

**वाचा:-** १) क्षमता बांधणी व पुर्वतयारी यासाठी प्राप्त प्रस्ताबाबत मुल्यमापन समितीचे दि. १९ एप्रिल २०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

२) राज्य कार्यकारी समितीच्या दि. २९ मे २०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

३) क्षमता बांधणी व पुर्वतयारी साठी प्राप्त निधीतून प्रतिसाद यंत्रणेनी मागणी केलेल्या साहित्य खरेदी करण्याबाबतचे दि. २५ ऑक्टोबर २०२३ चे प्रशासकीय मान्यतेचे आदेश.

४) दि. १५ मार्च २०२४ इन्फेटेबल रबर बोट (IRB) चे पुर्नप्रत्येयी आदेश.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या मार्गदर्शक सुचनेनुसार १५ व्या वित्त आयोगात क्षमता बांधणी व पुर्वतयारी साठी प्राप्त होणाऱ्या निधीतून प्रतिसाद यंत्रणेकडून मागणी करण्यात आलेल्या साहित्याचे संदर्भ क्र. १ च्या बैठकीत तांत्रिक समितीने मान्यता दिली असून संदर्भ क्र. २ च्या बैठकीत त्या साहित्याचे विवरण (Specification) राज्य कार्यकारी समितीने मान्यता दिली आहे. सदर साहित्य व उपकरणाच्या खरेदीसाठी संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली. सदर साहित्यामध्ये भारतीय भूसेना ( आर्मी )व राज्य आपत्ती प्रतिसाद दल व जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांनी मागणी इन्फेटेबल रबर बोट (IRB) मे. GANESHMFG PVT. हे पुरवठाधारक पात्र ठरले असून चे १२१ नग यासाठी एकूण रू. ७,०५,१२,७५२/- इतक्या रकमेचे सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने GeM Portal वर त्यांना कार्यरंभ आदेश देण्यात आला. त्यानंतर भारतीय भूसेना (आर्मी ) दिनांक २० फेब्रुवारी २०२४ रोजीच्या ईमेलद्वारे पूर्वी मागणी केलेल्या २४ FRB बोटींच्या ( Fiber Rubber boat) ऐवजी २४ IRB (Inflatable Rubber Boat) बोटींची मागणी केली. त्यानुसार दिनांक २८ फेब्रुवारी २०२४ च्या खरेदी समितीच्या बैठकीत उद्योग ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक ०१ डिसेंबर २०१६ च्या शासन निर्णयातील नियम ३.३.२ नुसार २४ IRB (Inflatable Rubber Boat) बोटींकरिता रु.१,३९,८६,०००/- एवढ्या रक्कमेचे पुर्नप्रत्येयी आदेश मे. GANESHMFG PVT यांना देण्यात आले.सदर कंपनीने पुरवठा केलेल्या पहिल्या टप्पयातील इन्फेटेबल रबर बोट (IRB) अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

मे. GANESHMFG PVT या कंपनीने पहिल्या टप्प्यात पुणे , रायगड, नागपूर, व वर्धा या ४ जिल्ह्यांना राज्य आपत्ती प्रतिसाद दल ( धुळे व नागपुर) व भारतीय भूसेना ( आर्मी )सदर निविदाधारकाने इन्फेटेबल रबर बोट (IRB) चा पुरवठा केला केलेल्या पुरवठयासाठी देयक सादर केलेले आहे.

याबाबत वस्तुनिहाय पुरवठा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र | तपशील | बोटींची संख्या |
|---|---|---|
| १ | जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण (पुणे , रायगड, नागपूर, वर्धा) | २७ |
| २ | राज्य आपत्ती प्रतिसाद दल ( धुळे व नागपुर) | १३ |
| ३ | भारतीय भूसेना ( आर्मी ) | १० |
| | **एकूण** | **५०** |

उपरोक्त प्रमाणे झालेल्या मालाचा पुरवठा केला असून वस्तु मिळाल्याबाबतची संबंधित कार्यालयाची चलने देयकासोबत प्राप्त झाली आहेत. मे. GANESHMFG PVT या कंपनीने वरील ४ जिल्यांना, राज्य आपत्ती प्रतिसाद दल (धुळे व नागपुर), व भारतीय भूसेना ( आर्मी ) ५ इन्फेटेबल रबर बोट (IRB) चा पुरवठा पहिल्या टप्पयात केला आहे. ते प्राप्त झाल्याचे संबंधित जिल्हयाकडून प्रमाणित करण्यात आले. त्यासाठी सादर केलेले **रु. २,९१,३७,५००/- (अक्षरी- दोन कोटी एक्यांन्नव लाख सदतीस हजार पाचशे रुपये मात्र)** एवढ्या रक्कमेचे देयक अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्र. सी-६ लेखाशिर्ष (२२४५) नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य, उपप्रधान लेखाशिर्ष ८० सर्व साधारण, गौणशिर्ष ९१ राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०१) पुर्वतयारी व क्षमताबांधणी (वित्त आयोग) (अनिवार्य) (२२४५ ४१८८) ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात येईल.

उपरोक्त निधी आहरित करण्यासाठी लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग आणि वित्तीय सल्लागार तथा सह सचिव यांना अनुक्रमे आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर आदेश वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. २९९/२०२३/व्यय-९, दि. १६ ऑक्टोबर, २०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०४१२१८०००८२४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.04.12 18:15:08 +05'30'

**( हितेंद्र दुफारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई.
२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
३) वित्तीय सल्लागार तथा सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
४) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवड नस्ती, आव्यप्र-१.